सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) सहाय्यित जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम उपक्रम राबविण्याकरिता निधी उपलब्ध करुन देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०२४/प्र.क्र.१०१/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक-२५ फेब्रुवारी, २०२५.

संदर्भ :-

१. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.माविम-२०१६/प्र.क्र.६७/का-१०, दि.०८.०१.२०१९, दि.०४.०१.२०२१ व दि.२६.०८.२०२४.
२. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.माविम-२०२३/प्र.क्र.११/का-१०, दि.२६.०८.२०२४,
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४,
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४,
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२३/प्र.क्र.११०/२०२३/ कोषा प्रशा-५, दि.१४.०२.२०२४,
६. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२४/प्र.क्र.२९/का-४, दि.०९.०९.२०२४.
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.१०५/अर्थ-३, दि.०१.०१.२०२५.

प्रस्तावना :-

आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) सहाय्यित "नव तेजस्विनी- महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" (Nav Tejaswini- Maharashtra Rural Women॰s Enterprise Development Project) महिला व बाल विकास विभागाच्या वतीने महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत राबविण्यास संदर्भाधीन दि.०८.०१.२०१९, दि.०४.०१.२०२१ व दि.२६.०८.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (आयफॅड) सहाय्यित "नव तेजस्विनी- महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" च्या केंद्र शासन व आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (आयफॅड) यांच्यामधील वित्तीय करारावर (Financing Agreement) आणि महाराष्ट्र शासन व आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (आयफॅड) यांच्यामधील प्रकल्प करारावर (Project Agreement) दि.२२.०१.२०२१ रोजी स्वाक्षरी झालेली आहे. त्यानुसार सदर प्रकल्प दि.२२.०१.२०२१ पासून महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत राबविण्यात येत आहे.

२. जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम (Gender Transformative Mechanism- GTM) च्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासन व IFAD यांच्यामध्ये सुधारित वित्तीय करार (Financing Agreement) दि.१०.११.२०२२ रोजी झालेला आहे. त्यानुसार आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (आयफॅड) कडून जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम (Gender Transformative Mechanism- GTM) उपक्रमाकरिता $५.२५ मिलियन (₹४२.०० कोटी) इतके अतिरिक्त अनुदान (ग्रँट) मंजूर करण्यात आला आहे.

३. महिला आर्थिक विकास महामंडळाला नवतेजस्विनी कार्यक्रमांतर्गत ज्या पध्दतीने निधी उपलब्ध करुन दिला जातो त्याच धरतीवर म्हणजेच, शासनानामार्फत माविमला निधी उपलब्ध करुन देण्यात येईल, तद्‌नंतर माविमव्दारे तो खर्च करण्यात येईल. त्यानंतर झालेल्या खर्चाच्या अनुषंगाने आयफॅडकडे विड्रॉव्हल ॲप्लीकेशन सादर करण्यात येईल. त्यानुसार आयफॅडकडून त्याची प्रतिपूर्ती झाल्यावर शासनास झालेल्या खर्चाचा परतावा

मिळणार आहे. तसेच, हा निधी Conditional grant on achievement of results या तत्वावर मंजूर करण्यात आलेला आहे. म्हणजेच GTM च्या कृती नियोजनानुसार प्राप्त परिणामांची पूर्तता झाल्यावर तो निधी प्रकल्पास मिळणार आहे.

४. आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) व केंद्र शासन यांच्यामध्ये झालेल्या वित्तीय करारानुसार जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम (Gender Transformative Mechanism- GTM) उपक्रमाकरिता Minimum Access Condition (MAC) ची पूर्तता झाल्यावर अनुदानाचा पहिला हप्ता BMGF कडून IFAD, IFAD कडून केंद्र शासन व केंद्र शासनाकडून महाराष्ट्र शासनास उपलब्ध होणार आहे. त्यानुसार महिला आर्थिक विकास महामंडळाने पहिल्या हप्त्याकरिता Minimum Access Condition (MAC) ची पूर्तता करुन दि.३०.०८.२०२४ रोजी USD १९,००,००० ची मागणी केंद्र शासनाकडे केली होती. त्यास अनुसरुन वित्त मंत्रालय, भारत सरकार यांनी दि.१.१०.२०२४ च्या पत्रान्वये USD १९,००,००० (₹१५८८.१६ लक्ष) इतका निधी महाराष्ट्र शासनाला उपलब्ध करुन दिलेला असून, सदर निधी शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे.

५. त्यानुसार सन २०२४-२५ मध्ये जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम (GTM) उपक्रम राबविण्यासाठी केंद्र शासनाने महाराष्ट्र शासनाला उपलब्ध करुन दिलेला ₹१५८८.१६ लक्ष इतका निधी हिवाळी अधिवेशन, २०२५ मध्ये पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पित करण्यात आला असून, सदर निधी जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम (GTM) उपक्रम राबविण्यासाठी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधी होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षात आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (आयफॅड) सहाय्यित जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम (Gender Transformative Mechanism- GTM) उपक्रम राबविण्याकरिता आयफॅडचा हिस्सा म्हणून विवरणपत्रातील रकाना क्रमांक (२) मधील लेखाशीर्ष/ उद्दिष्टाकरिता रकाना क्रमांक (४) प्रमाणे एकूण **₹१५८८.१६ लक्ष (अक्षरी रुपये पंधरा कोटी अठ्ठ्याऐंशी लक्ष सोळा हजार फक्त)** इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळास (माविम) वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | प्रधान/ लेखाशिर्ष / संगणक सांकेतांक/ उद्दिष्ट | अर्थसंकल्पीय तरतूद | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | मागणी क्रमांक एक्स-१,<br>२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण,<br>(०३) इतर योजना,<br>(०३) (१५) जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम उपक्रम राबविण्याकरिता माविमसाठी सहायक अनुदान (आयफॅड हिस्सा) (कार्यक्रम)<br>(२२३५ डी ६७८)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | **१५८८.१६** | **१५८८.१६** |

२. सदर निधीमधून आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) सहाय्यित जेंडर ट्रान्सफॉरमेटीव्ह मेकॅनिझम (Gender Transformative Mechanism- GTM) उपक्रमांतर्गत प्रत्यक्षात हाती घ्यावयाच्या शासनमान्य घटकांवरच खर्च होईल, याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास व शासनास सादर करण्याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

४. सदर निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व सह सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. सह सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

६. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना म.को.नि. नमुना क्रमांक ४४ देयकांव्दारे राज्याच्या एकत्रित निधीतून २७- लहान बांधकामे, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर), ३३-अर्थसहाय्य, ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान, ५०-इतर खर्च, ५३-मोठी बांधकामे आणि वित्त विभागाव्दारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी “आभासी वैयक्तिक ठेव लेखा [Virtual Personal Deposit Account (VPDA)]” ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करण्यात यावी, अशा सूचना वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.५ येथील दि.१४.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. त्यानुसार महिला व बाल विकास विभागाने संदर्भाधीन क्र.६ येथील दि.०९.०९.२०२४ च्या शासन निर्णयान्वये सदर उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी “आभासी वैयक्तिक ठेव लेखा [Virtual Personal Deposit Account (VPDA)]” ही व्यवस्था व कार्यपध्दती लागू करण्यास मान्यता दिलेली आहे. तसेच, सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद आहरण व संवितरण अधिकारी यांना सदर शासन निर्णयाव्दारे आभासी वैयक्तिक लेखा प्रशासक म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यामुळे वित्त विभागाच्या दि.१४.०२.२०२४ व महिला व बाल विकास विभागाच्या दि.०९.०९.२०२४ च्या शासन निर्णयातील नमूद अटी व शर्तींचे पालन करुन आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांनी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करावा.

७. सदर निधी खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

८. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला निधी चालू वित्तीय वर्षात खर्च करण्याची तसेच अखर्चित राहणारा निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी समर्पित करण्याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

९. हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३५/२०२५/का.१४७२, दि.३०.०१.२०२५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४९/व्यय-६, दि.१२.०२.२०२५ अन्वये त्या विभागांनी दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२२५१५०८४३०४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAHEBRAO DHANRAJ BHOYE

Digitally signed by SAHEBRAO DHANRAJ BHOYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=201303bc41ec1fa4d14ccef33019b230317b039f951887dd25d72febda91bf82, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9F3A08DCEC2321C344A1916033CF8C938EFBE80C42926638012D340624F73C19, cn=SAHEBRAO DHANRAJ BHOYE
Date: 2025.02.25 15:10:33 +05'30'

**( साहेबराव भोये )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१,
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
५. मा.मंत्री (म.व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
८. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर,
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
१२. निवड नस्ती, का-१०.